**राज्यातील अल्पसंख्याक बहुल ग्रामीण क्षेत्रात मूलभूत/ पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी अनुदान वितरित करण्यास मंजूरी देण्याबाबत-सन २०१४-१५**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्राक्षेयो-२०१४/प्र.क्र.१६१/का.९**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १५/०१/२०१५

वाचा -

**१. शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग क्र.अविवि २०१०/प्र.क्र.३१/१०/का.७, दि.१४/५/२०१३**

**२. शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग क्र.ग्राक्षेवि २०१४/प्र.क्र.५१/२०१४/का.७ दि. २१/६/२०१४**

**३.उपमुख्य कार्यकारी अधिकारी, ( ग्रामपंचायत ) जिल्हापरिषद, सातारा यांचे दि.३१/८/२०१४ चे पत्र**

**शासन निर्णय-**

राज्यातील अल्पसंख्याक बहुल ग्रामीण क्षेत्रात मुलभूत/ पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देऊन ग्रामीण भागात वास्तव्यास असलेल्या अल्पसंख्याक लोकसमुहातील नागरिकांच्या जीवनमानाचा दर्जा उंचावण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सन २०१३-१४ या वर्षापासून ग्रामीण क्षेत्र विकास कार्यक्रम कार्यान्वित करण्यास मंजूरी देण्यात आली आहे.

२. ग्रामीण क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत सन २०१४-१५ वर्षात अनुदान मिळण्यासाठी जिल्हाधिकारी, सातारा यांच्या अध्यक्षतेखालील समितीकडून शासनास प्राप्त झालेल्या अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींच्या प्रस्तावांची छाननी करण्यात आली. छाननीअंती विहित निकषांनुसार अनुदान मिळण्यास पात्र ठरलेल्या सातारा जिल्हयातील अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींना या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट- “अ” मध्ये दर्शविल्याप्रमाणे ग्रामीण क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत रु.१,१०,००,०००/- ( अक्षरी रु. एक कोटी दहा लाख फक्त ) अनुदान मंजूर करण्यात येत असून हे अनुदान जिल्हाधिकारी सातारा यांचेमार्फत मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद यांच्या स्वाधीन करण्यात येत आहे.

३. संबंधित अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींना मंजूर करण्यात आलेले अनुदान वितरित करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

४. अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींनी मागणी केल्यानुसार ज्या विवक्षीत प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, केवळ त्याच प्रयोजनासाठी संबंधित अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींनी निधी खर्ची टाकणे अनिवार्य आहे. संबंधित जिल्हाधिकारी / मुख्य कार्यकारी अधिकारी , संबंधित जिल्हा परिषद

यांच्याकडून अनुदान वितरित करण्यात आल्यानंतर अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींनी प्रस्तावात नमूद केलेली कामे पूर्ण करणे आवश्यक आहे व याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे या शासन निर्णयाच्या परिशिष्ट - "ब" मध्ये विहित केलेल्या नमुन्यात अल्पसंख्याक विकास विभागाकडे सादर करणे आवश्यक आहे. ग्रामीण क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत राज्यातील संबंधित अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींनी हाती घेतलेल्या विकासकामांच्या प्रगतीबाबत संनियंत्रण करुन त्याबाबतचा अहवाल संबंधित जिल्हाधिकारी यांनी शासनास सादर करावा.

५. या योजनेंतर्गत होणारा खर्च " मागणी क्र. झेड ई -१, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, १९८-ग्रामपंचायतींना सहाय्य, राज्य योजनांतर्गत योजना, ०१ अल्पसंख्याकांना सहाय्य, (०१) (०१) अल्पसंख्याक बहुल ग्रामपंचायतींना सहायक अनुदान (२२३५ बी ०८५)" या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात येईल.

६. हे आदेश नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३६२ /का-१४७५, दि.२६/११/२०१४ अन्वये प्राप्त मान्यतेस तसेच वित्त विभागाने त्यांच्या अनौचारिक संदर्भ क्रमांक १०७६/१४/व्यय-४,दि. १/१२/२०१४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११६११४७३००५१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANGURDE SANJAY SURYAKANT

Digitally signed by GANGURDE SANJAY SURYAKANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT,CID - 919995, postalCode=400032, st=Maharashtra, cn=GANGURDE SANJAY SURYAKANT
Date: 2015.01.16 12:03:17 +05'30'

**( सं.सु. गांगुर्डे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. मा.उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
५. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
६. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
७. महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) , मुंबई / नागपूर,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

१०.संबंधित जिल्हाधिकारी/ मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद
११.संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद
१२.मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अल्पसंख्याक विकास) यांचे खाजगी सचिव,
१३.सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१४.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी),
१५.निवडनस्ती

शासन निर्णय क्रमांक : ग्राक्षेयो-२०१४/प्र.क्र.१६१ /का.९, दि. १५ जानेवारी, २०१५ सोबतचे परिशिष्ट“ -अ”

| अ.क्र. | तालुका | ग्रामपंचायतीचे नाव | अल्पसंख्याक प्रवर्ग | प्रस्तावित विकास कामे | घ्यावयाच्या विकास कामासाठी येणारा खर्च / अनुदान |
|---|---|---|---|---|---|
| १ | फलटण | सांगवी | बौध्द | राजेकुरण बेंगला (सांगवी) बौध्द वस्तीमध्ये रस्ता डांबरीकरण करणे | रु. १० लक्ष |
| २ | खटाव | खटाव | मुस्लिम | मुस्लिम समाज दफनभूमी (कब्रस्तान )येथे संरक्षण भिंत बांधणे | रु. १० लक्ष |
| ३ | कोरेगाव | भिमनगर | बौध्द | गावातील अंतर्गत रस्ते डांबरीकरण करणे | रु. १० लक्ष |
| ४ | सातारा | शहापुरी | मुस्लिम | मुस्लिम समाजासाठी सार्वजनिक सभागृह / शादीखाना हॉल बांधणे | रु. १० लक्ष |
| ५ | वाई | पांडे | बौध्द | दलित वस्तीमध्ये अंतर्गत रस्ते करणे | रु. ५ लक्ष |
| | | | | दलित वस्तीमध्ये रस्त्यालगत संरक्षक भिंत व गटर्स बांधणे | रु. ५ लक्ष |
| ६ | पाटण | कुंभारगाव | बौध्द | बौध्द वस्तीमध्ये स्मशाणभूमी संरक्षण भिंत बांधणे व बौध्द वस्तीतील अंतर्गत रस्ते सिमेंट कॉंक्रीटीकरण करणे | रु. १० लक्ष |
| ७ | कराड | उंब्रज | बौध्द | तक्षशीला नगर मधील रस्ते डांबरीकरण व खडीकरण करणे | रु. १० लक्ष |
| ८ | | वाघेरी | मुस्लिम | कब्रस्तान जागेसाठी संरक्षणे भिंतीसह सर्व सुविधा करणे | रु. १० लक्ष |
| ९ | | पाडळी केसे | मुस्लिम | मुस्लिम वस्तीत अंतर्गत रस्ते खडीकरण व डांबरीकरण करणे | रु. १० लक्ष |
| १० | | गोटे | मुस्लिम | दफनभूमीसाठी संरक्षण भिंत बांधणे | रु. १० लक्ष |
| ११ | खंडाळा | खंडाळा | बौध्द | बौध्द वस्तीमध्ये अंतर्गत रस्ते कॉंक्रीटीकरण करणे. | रु. १० लक्ष |
| **एकूण (अक्षरी रु. एक कोटी दहा लाख फक्त)** | | | | | रु.१,१०,००,०००/- |

GANGURDE SANJAY SURYAKANT

Digitally signed by GANGURDE SANJAY SURYAKANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT,CID - 919995, postalCode=400032, st=Maharashtra, cn=GANGURDE SANJAY SURYAKANT
Date: 2015.01.16 12:03:55 +05'30'

( सं.सु. गांगुर्डे )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**शासन निर्णय क्रमांक : ग्राक्षेयो-२०१४/प्र.क्र.१६१/का.९, दि. १५ जानेवारी, २०१५, सोबतचे,**

**परिशिष्ट- “ब”**

**उपयोगिता प्रमाणपत्राचा नमुना**

प्रमाणित करण्यात येते की, अल्पसंख्याक विकास विभागाने राज्यातील अल्पसंख्याक बहुल ग्रामीण क्षेत्रात मुलभूत / पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी कार्यान्वित केलेल्या क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. ,दि. अन्वये वितरित केलेला रु. (अक्षरी रु. ) एवढा निधी पुढील विकासकामांसाठी उपयोगात आणला आहे :-

| विकासकाम/ विकासकामे | वापरलेली रक्कम |
|---|---|
| अ | |
| ब | |
| क | |
| ड | |

२. असेही प्रमाणित करण्यात येते की, क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत ज्या निकष / अटींनुसार शासनाने अनुदान मंजूर केले होते, त्या निकष/ अटींची यथायोग्यरित्या पुर्तता करण्यात आली आहे. तसेच ज्या प्रयोजनाकरिता निधि मंजूर करण्यात आला होता, त्याच प्रयोजनाकरिता निधिचा प्रत्यक्षात विनियोग झाला आहे, याची खातरजमा करण्याकरिता मी खालील दस्तऐवज/अभिलेखांची तपासणी केली आहे :-

१. प्रमाणक आणि पुस्तक लेखा (Vouchers and Book of Accounts)

२. मोजणी पुस्तके (Measurement Books)

३. सहायक अनुदान / कर्ज नोंदवही (Grant-in-aid/ Loan Register)

४. खर्च नोंदवही (Expenditure Register)

| ग्रामविकास अधिकारी / ग्रामसेवक, संबंधित ग्रामपंचायत यांची स्वाक्षरी | मुख्य कार्यकारी अधिकारी, संबंधित जिल्हा परिषद यांची प्रतिस्वाक्षरी |
|---|---|
| नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा | नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा |

***